महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्यसेवा,गट-अ मधील (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड पे रु.६६००/-) जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गात देण्यात आलेली नियुक्ती रद्द करणेबाबत.. डॉ.परमेश्वर मरीबा साळवे.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नामनि २०१३/प्र.क्र.४६१/सेवा २**
गो.ते.रुग्णालय इमारत संकुल,१० वा मजला, ए विंग,
मंत्रालय,मुंबई ४०० ००१
दिनांक : १० एप्रिल,२०१५

वाचा -

१) **महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्रमांक ४१९४(१)(४)/३७७४/पंधरा अ, दि-८.८.२०१३**
२) **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र. नामनि २०१३/प्र.क्र.४६१/सेवा २, दि.१८.११.२०१३**
३) **सहसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/मवैआसे/नामनि/डॉ.साळवे/टे-२/कक्ष-१/६४/१३, दि.४.१.२०१४**

प्रस्तावना -

डॉ.परमेश्वर मरीबा साळवे यांना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या संदर्भ क्रमांक १ येथील दि.८.८.२०१३ रोजीच्या शिफारशीनुसार संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णय दिनांक १८.११.२०१३ अन्वये नामनिर्देशनाने वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय,बोरी, जि.परभणी येथे नियुक्ती देण्यात आली आहे. तथापि, डॉ.साळवे हे वैद्यकीय अधिकारी म्हणून या विभागात कार्यरत होते. त्यांची दिनांक २०.१०.२०१२ च्या आदेशान्वये स्वेच्छानिवृत्ती मंजूर करण्यात आली असल्याचे निदर्शनास आले आहे. यास्तव संदर्भ क्र. २ येथील दिनांक १८.११.२०१३ च्या शासन निर्णयान्वये त्यांना देण्यात आलेली जिल्हा शल्यचिकित्सक संवर्गातील नियुक्ती रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,गट-अ (वेतनश्रेणी रु. १५६००-३९१०० ग्रेड पे ६६००) वेतनश्रेणीमधील जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गात डॉ. परमेश्वर मरीबा साळवे यांना संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये नियुक्ती देवून त्यांची पदस्थापना वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, बोरी, जि.परभणी येथे करण्यात आली आहे. तथापि, दिनांक २०.१०.२०१२ च्या शासन निर्णयान्वये त्यांची स्वेच्छानिवृत्ती मंजूर करण्यात आली आहे. तसेच त्यांना सेवानिवृत्तीविषयक सर्व लाभ देण्यात आलेले आहेत. डॉ. साळवे नियमित

सेवानिवृत्ती वेतन घेत असल्याचे संदर्भाधीन क्रमांक ३ येथील पत्रान्वये निदर्शनास आले आहे. यास्तव शासन या आदेशान्वये डॉ.परमेश्वर मरीबा साळवे यांचे वैद्यकीय अधिक्षक,ग्रामीण रुग्णालय, बोरी, जि.परभणी या पदावरील नियुक्तीचे आदेश तात्काळ रद्द करीत आहे.

हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०३३११७३८३९१३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO

Digitally signed by GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO
DN: CN = GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH,CID - 918117
Date: 2015.04.10 15:33:26 +05'30'

**(वि.पु.घोडके)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्रान्वये)
२) संचालक, आरोग्य सेवा,मुंबई
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
४) उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
५) जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, परभणी
६) महालेखापाल (लेखा व परिक्षा ) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी , परभणी
९) डॉ. परमेश्वर मरीबा साळवे, काद्राबाद प्लॉट गोलघुमट जवळ, परभणी ४३१ ४०१
१०) मा.प्रधान सचिव (सा.आ.) यांचे स्वीय सहायक
११) निवड नस्ती